<u>मागणी क्रमांक झेड एच-५, लेखाशिर्ष ४७०२ ए ०१९.</u>
**पाझर तलाव क्र.१५, मौजे वाघ्रुळ जा. ता. जि. जालना.**
**(भूसंपादन निधी)**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : भूसंपा-२०२५/प्र.क्र. ३१९/जल-०४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ३० एप्रिल, २०२५.

<u>वाचा</u>: १) मृद व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र. भूसंपा-२०१७/प्र.क्र.२३३(भा-२)/जल-४, दिनांक ८/०२/२०१९.
२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३,दिनांक ०७/०४/२०२५.
३) प्रादेशिक जलंसधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, छत्रपती संभाजी नगर यांचे पत्र क्र. प्रा.जल.अ. / लेखा-१/ भु.सं. / ९४१/सह्, दिनांक २२/०४/२०२५.
४) मा. उच्च न्यायालय, खंडपीठ छत्रपती संभाजीनगर यांचे दिनांक २२/०४/२०२५ रोजीचे आदेश.

<u>**प्रस्तावना:**</u> मराठवाडा एकात्मिक विकास कार्यक्रमांतर्गत पाझर तलाव क्र. १५, मौजे वाघ्रुळ जा. ता. जि. जालना या योजनेसाठी संपादित केलेल्या जमीनीच्या भूसंपादन प्रकरणामध्ये मा. उच्च न्यायालय, खंडपीठ छत्रपती संभाजीनगर यांनी दिलेल्या निदेशानुसार रुपये ४०.०० लक्ष इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. वास्तविक पाहता जिल्हा परिषदांनी मंजूर केलेल्या प्रकल्पावरिल भूसंपादनाचा मोबदला त्यांनी स्वत:च्या आर्थिक स्त्रोतातून पूर्ण करणे आवश्यक आहे. मात्र प्रस्तुत प्रकल्पाकरिता यापूर्वी शासनाकडून निधी उपलब्ध करुन देण्यात आला असल्याने तसेच प्रकरणी मा. उच्च न्यायालयाचे दिनांक २२/०४/२०२५ रोजी आदेश झाले असल्याने प्राप्त संदर्भिय क्र. ३ येथील प्रस्तावावर वित्त विभागाचे संदर्भिय शासन निर्णयामधील सूचना विचारात घेवून नियोजन व वित्त विभागाच्या पूर्व मान्यतेने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

<u>**निर्णय**</u> : **पाझर तलाव क्र. १५, मौजे वाघ्रुळ जा. ता. जि. जालना या प्रकल्पासाठी संपादित जमीनीच्या भूसंपादन प्रकरणामध्ये मा. उच्च न्यायालय, खंडपीठ छत्रपती संभाजीनगर यांनी दिलेल्या निदेशानुसार रक्कम रुपये ४०.०० लक्ष (अक्षरी रुपये चाळीस लक्ष फक्त) मा. न्यायालयात जमा करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.**

**अ)** वरील प्रकल्पाच्या भूसंपादनाकरिता अन्य स्त्रोतांकडून निधी उपलब्ध झाला असल्यास याद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या रक्कमांचे आहरण अथवा वितरण करण्यात येवू नये,

**ब)** तसेच भूसंपादन प्रयोजनार्थ उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या वरील निधीची गरज नसल्यास, सदर निधी कोणत्याही परिस्थितीत परस्पर अन्य प्रयोजनार्थ वितरित करण्यात येवू नये,

**क)** कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदर रक्कम तातडीने शासनाकडे प्रत्यार्पीत करावी,

**ड)** निधी वितरणासंबंधीच्या वित्त विभागाच्या संदर्भीय दिनांक ०७/०४/२०२५ च्या शासन निर्णयामधील मार्गदर्शक सुचनांचे काटेकोर पालन करावे.

३. याद्वारे वितरित करण्यात आलेली रक्कम प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, छत्रपती संभाजीनगर यांनी आहरित करुन, त्यांचे अधिनस्त संबंधित अधिकाऱ्यांकडे त्वरेने वितरित करावी.

४. यावर होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक झेड एच-५,
४७०२- लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च,
००
१०१, भूपृष्ठ जल
(०१) लहान पाटबंधारे,
(०१) (०१) लहान पाटबंधारे योजना, ० ते १०० हे.सि. क्षमता (कार्यक्रम) (४७०२ ए ०१९),
५३, मोठी बांधकामे

५. वरील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखाकार कार्यालयास सादर करुन त्याच्या प्रतिस्वाक्षरित प्रती अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे आणि शासनास सादर कराव्यात.

६. याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, छत्रपती संभाजीनगर यांची राहील व अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे हे सदर बाबींचे समन्वयक प्राधिकारी राहतील.

७. प्रस्तुत आदेश, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ११०/२०२५/१४३४, दिनांक २३/०४/२०२५ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३१४/२०२५/ व्यय-१५, दिनांक २५/०४/२०२५ च्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत असून महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०४३०१७२७०८३९२६ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार वा नांवाने.

RAJESH HEMCHAND BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=ed7af9a8be3d880eda8e29b769ac16864ea0732c103c7f011129ff654701c22c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7A690C5B955786C61B12D2A97A09E71E030D081D0786B3D4740E1A0078F4684, cn=RAJESH HEMCHAND BAGDE
Date: 2025.04.30 17:28:03 +05'30'

**(रा.हे. बागडे)**

**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१) अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे.

२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, छत्रपती संभाजीनगर.
३) उपविभागीय अधिकारी तथा भूसंपादन अधिकारी, जि. जालना.
४) जिल्हा जलसंधारण अधिकारी, लघु सिंचन विभाग, जिल्हा परिषद, जालना.
५) महालेखापाल (लेख व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जालना.
७) कक्ष अधिकारी (जल-११), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
८) निवड नस्ती, कार्यासन (जल-४)

**प्रत अग्रेषित,**

१. मा. विरोधी पक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
३. स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फत संबंधीत लघु सिंचन (जलसंधारण) उपविभागीय अभियंता)
४. सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई. (यांचे स्वीय सहायक)
५. आयुक्त, मृद व जलसंधारण विभाग, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर.